महालनोबिस राष्ट्रीय फसल पूर्वोनुमान केंद्र, भारत सरकार यांचेमार्फत राबविण्यात येणाऱ्या फसल प्रकल्पाकरिता बँक खाती उघडण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पीएफएम-२०१७/प्र.क्र.४५/१७/भाग-१/२-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ०४ ऑगस्ट, २०२३.

**वाचा:**
१. कृषि व पदुम विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २७.०९.२०१७.
२. कृषि व पदुम विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २९.०९.२०१७.
३. शासन पत्र क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३४/११-अे दि. १७.०१.२०२२.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.F-३/२(१)/GT/२०२०-MNCFC/C-८७१७०/१२०-१३५, दि.१८.११.२०२२.
५. संचालक (वि.व प्र.), कृषि आयुक्तालय यांचे पत्र क्र. जा.क्र.कृआ/ सां.७/४१३०/ PFMS/ २२-२३, दि. ०३.०२.२०२३.

**प्रस्तावना:**

या विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील आदेशान्वये कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या एकूण ११ केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यीत योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे कार्यान्वित करण्यात आल्या असून एकूण ३५१ बँक खाती उघडण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तथापि, मान्यता प्रदान करण्यात आलेल्या योजनांमध्ये फसल कार्यक्रमाचा समावेश नसल्याने महालनोबिस राष्ट्रीय फसल पूर्वानुमान केंद्र, भारत सरकार यांचेमार्फत कृषि विद्यापीठे व राज्य सुदूर संवेदन केंद्र यांचे सहकार्याने फसल (FASAL Forecasting Agriculture output using space, Agro-Meteorology and Land based observations) हा प्रकल्प राबविण्यात येत असून सदर प्रकल्पासाठी नव्याने बँक खाते उघडण्याऐवजी पिकांच्या आकडेवारीत सुधारणा (ICS) व कृषि विषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देणे (TRA) या योजनांकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर यापूर्वी मॅपिंग करण्यात आलेले बँक खाते वापरण्याकरिता शासनाचे संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे. तथापि, केंद्र शासनाचे संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये ग्राउंड टुथिंग करिता राबविण्यात येणाऱ्या फसल कार्यक्रमाकरिता व्याज मिळू शकणारे बँक खाते (Interest bearing bank account) राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्यात यावे, असे निर्देश प्राप्त झाले आहेत.

२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन, ग्राउंड टुथिंग करिता राबविण्यात येणाऱ्या फसल कार्यक्रमाकरिता आयुक्तालय स्तरावर १ व विभागीय कृषि सह संचालक स्तरावर ८ खाते अशी एकूण ९ बँक खाती राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्यास शासन मान्यता देण्याबाबत, तसेच या प्रकल्पाकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे बँक खात्यातील व्यवहार करण्यासाठी कृषि आयुक्तालय स्तरावर त्यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी

यांना मेकर (Maker) व सहाय्यक संचालक लेखा-१ यांना चेकर (Checker) म्हणून, तसेच कृषि सहसंचालक स्तरावर त्यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी यांना मेकर (Maker) व विभागीय कृषि सहसंचालक यांना चेकर (Checker) म्हणून नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

कृषी विभागामार्फत ग्राउंड टुथिंग करिता राबविण्यात येणाऱ्या फसल कार्यक्रमाकरिता आयुक्तालय स्तरावर १ व विभागीय कृषि सह संचालक स्तरावर ८ अशी एकूण ९ व्याज मिळू शकणारी (Interest benefit bearing account) बँक खाती राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्यास शासनस्तरावरुन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर योजनांकरीता वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे बँक खात्यातील व्यवहार करण्यासाठी कृषि आयुक्तालय स्तरावर त्यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी यांना मेकर (Maker), सहाय्यक संचालक लेखा-१ यांना चेकर (Checker), तसेच कृषि सहसंचालक स्तरावर त्यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी यांना मेकर (Maker) व विभागीय कृषि सहसंचालक यांना चेकर (Checker) म्हणून जबाबदारी सोपविण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय या विभागाचे संदर्भ क्र.१ येथील दि.२७.०९.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामधील खालील नमुद अटी व शर्तींच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१९२/२०२३/व्यय-१, दि.११.०७.२०२३ व अनौ.संदर्भ क्र.१८५/२०२३/कोषा प्रशा-५, दि.२०.०७.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

(i) फसल योजनेकरिता उघडण्यात येणाऱ्या एकूण उक्त ९ खात्यांमध्ये केवळ सदर योजनेकरिताचेच अनुदान जमा करण्यात यावे.

(ii) सदर बँक खाती फसल योजना सुरु असेपर्यंत चालू ठेवण्यात यावीत. सदर योजना बंद झाल्यास त्या योजनांची खाती बंद करण्यात यावीत. सदरची जबाबदारी विभागीय स्तरावर कृषि सहसंचालक यांची व आयुक्त स्तरावर आयुक्त (कृषि) यांची असेल.

(iii) सदर खात्यांवरील व्याजाची रक्कम तसेच शिल्लक रक्कम याचा ताळमेळ घेण्यात यावा.

(iv) सदर बँक खात्यामध्ये व्याजाची रक्कम दिर्घकाळ विनावापर पडून रहाणार नाही या दृष्टीने उचित कार्यवाही करावी.

(v) सदर बँक खात्यामध्ये जमा होणा-या व्याजाचा वेळोवेळी आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

(vi) वित्तीय औचित्याच्या सूत्राचे पालन व्हावे.

(vii) उपरोक्त (२) प्रमाणे व्यवहार होत असल्याने, कोणत्याही परिस्थितीत चेकबुकचा वापर होणार नाही. त्यामुळे सदर खाते विना चेकबुकचे असल्याबाबत लेखी आदेश सर्व संबंधितांनी त्यांच्यास्तरावर बँकाना द्यावेत.

(viii) सदर खात्यातूनन रोख अथवा चेकबुक अथवा विड्रावल स्लिप (Withdrawal Slip) या मार्गाने व्यवहार करण्यावर बंदी घालण्यात येत आहे.

(ix) आयुक्त (कृषि) स्तरावर आवश्यकतेनुसार विड्रावल (Withdrawal) ही सुविधा उपलब्ध असेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०४१८१४४१२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.08.04 18:16:36 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
४. कृषि सहसंचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई,
६. सहसंचालक (सुधारणा ) संचालनालय,लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
८. महालेखाकार कार्यालय, मुंबई /नागपूर-१/२, महाराष्ट्र.
९. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (११-अे ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सहाय्यक संचालक (लेखा-१/२), कृषि आयुक्तालय, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय-२/अर्थ-१३/कोषा प्रशा-५), मंत्रालय, मुंबई.
१२. लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे.
१३. उप महाप्रबंधक, डिजिटल आणि लेणदेण बँकींग शासकिय व्यावसायिक विभाग, सायनरजी सी-६/जी ब्लॉक बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पूर्व) मुंबई- ४०० ०५१.
१४. सहाय्यक राज्य नोडल अधिकारी, पीएफएमएस, मुंबई.
१५. निवड नस्ती ( कार्यासन २-अे ).